# आचार्य आणि ज्ञानदेवांचें तत्त्वज्ञान

स्वामी स्वरूपानंद एक प्रतिभासंपन्न आणि नवनिर्मितीची क्षमता असलेलें विलक्षण मधुर असें व्यक्तित्त्व होतें. त्यांच्या 'अभंग ज्ञानेश्वरी' प्रमाणे त्यांनी 'अभंग चांगदेव पासष्टी' केली आहे. त्यांत एका ओवीच्या अनुवाद प्रसंगीं सिद्धान्तांत नव्हें, पण अभंग रचनेमध्यें नक्कीच दोष आहे. हें मी पहिल्या भेटींत त्यांच्या निदर्शनास आणून दिलें. ते एवढेच म्हणाले की, तुमच्या म्हणण्यांत तथ्य आहे. मात्र, 'अभंग अमृता-नुभवांत' एकहि स्थळ असे नाहीं. हा ग्रंथ अव्यंग परिपूर्ण आहे.

पंडित पांडुरंग शर्मा आणि प्रल्हाद सीताराम सुबंध हे दोघेहि "ज्ञानदेवांचा चिद्विलासवाद हा आचार्यांच्या माया-वादाहून सर्वस्वी भिन्न आहे" असे मानणारे आहेत.

जग असकी वस्तुप्रभा । वस्तूची पावे शोभा ।<br>
जातसे लाभा । वस्तूशीची ।।<br>
जालेनि जगें मी झाके । तरी जगत्वें कोण फाके ।।

आचार्य अथवा ज्ञानदेव हे दोघेहि, जोपर्यन्त आपण मनाच्या पातळीवर आहोत तोपर्यन्त मुळीच समजणार नाहीत. उलट त्या दोघांच्याविषयीं व्यामोहच होणार; यांत अस्वाभाविक असे कांहीं नाही. हें असें कां होतें तर Mind is negation या वस्तुस्थितीमुळें हें असें घडतें. मात्र हीच गोष्ट आमच्या ध्यानीं येत नाही. No-mind हीच खरी विधायक स्थिती आहे. Mind is negative fenamena and

No-mind is positive fenamena. मात्र, हें मला फार फार उशीरा कळले.

माझ्या मतें आचार्यांना समजून घेण्यांत जे लोक कमी पडतात त्यांना ज्ञानदेव न कळत चपराक आहे. आणि ज्ञानदेवासंबंधीं अनाठायीं कल्पना करणारांना ‘अभंग अमृतानुभव’ पान १५२, यांत ज्ञानदेवांनीच न कळत त्यांच्या श्रीमुखात दिली आहे. खरी स्थिती अशी आहे कीं, आचार्य अथवा ज्ञानदेव तुम्हास कोणताहि निश्चय करून नि:शंक होऊं देणार नाहीत. यामुळेंच या वादाचा तटका चंद्र-सूर्य असेपर्यन्त तुटणार नाही. परिपूर्ण एकरूप असलेल्या या दोघांच्या तत्त्वज्ञानांतील मांडणींमध्यें असणारा पराकाष्ठेचा भेद गिळतांना चांगल्या चांगल्यांची फाटली आहे. मुळांत भारतीय तत्त्वज्ञान पराकाष्ठेचे गहन आणि त्यामुळेंच तें उच्यतम आहें. नेमकी याच गोष्टीची आम्हास अंधुकशीहि जाणीव नाही. ही किती निर्बुद्धपणाची आणि त्यामुळेंच दु:खाची अवस्था आहे ! यांतून निर्माण झालेल्या सावळ्या गोंधळामुळेंच या वादंगाचें तुंबळ युद्ध माजून राहिलें आहें.

आचार्य म्हणतात जगत् हें मायिक आहे. तर ज्ञानदेव म्हणतात जगत् हा चिद्विलास आहे. आचार्य म्हणतात प्रकृति ही पुरूषाची उपाधि आहे. तर ज्ञानदेव म्हणतात ऐसी इये निरूपाधिके । जगाची जिये जनके ।। अमृतानुभव.

बेट्यांनो तुम्ही ‘बे दुणे चार’ या हिशेबाने चालत आहांत ना? तुमची खोडकीच मोडणार आहे. करा विचार, खाजवा डोकं. परिणाम म्हणाल तर शून्य. बे दुणे तीन

किंवा पांच होणें च जास्त यथार्थ होईल; अर्थात् हें गणित ज्या दिवशीं आपल्याला कळेल त्याच दिवशीं बुद्धीचा व्यामोह दूर होईल.

यदा ते मोह कलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।।

'निर्वेदं गन्तासि' म्हणजे हें सगळे तुला जिरविता येईल. म्हणजे वरवरचे दिसणारे भेद तुला गिळतां येतील.

स्थिती आणि गति एकत्र राहूं शकतात कां? नाहीं. सामान्य तर्कांत हें बसत नाहीं. मात्र,तर्कापलीकडील स्थितींत हें बसतें. म्हणजे स्थिती आणि गति, दोन्ही एकाच वेळीं आणि एकाच ठिकाणीं सुखेनैव राहूं शकतात. याला इंग्रजी मध्यें Dialectics म्हणतात. मात्र, यासाठीं आचार्यांना विवर्त वादाची तडजोड करावी लागली. आचार्य प्रखर विचारक होते तर ज्ञानदेव अभिजात कवि होते. हा प्रकृतिभेद आहे. अर्थात् ज्ञानदेवांनी चिद्विलास ही तडजोड केली. नवल असे की, हीच गोष्ट अनेकजण विसरले; या तडजोडीचाच अनेक लोक अभिनिवेश बाळगूं लागले. बुद्धि बोद्ध्या सोके । ते एवढी वस्तू चुके ।। असा प्रकार होत राहिला. आचार्यानंतर ६०० वर्षांत आमची बुद्धि शेवाळली होती. तिला गंज चढला होता. यानंतर ज्ञानदेव जन्मास आले. फार बरें झालें. आतां या दोघांनीहि आमची तुळतुळीत हजामत चालविली आहे. आतां हा केशसंभार दूर झाल्यामुळें आमच्या बुद्धीचें उद्दामपण संपत चाललें आहें आणि विनिर्मुक्त बुद्धीनें चिंतन करण्याचें आमचें सामर्थ्य उत्तरोत्तर वाढत चाललें आहें.

आचार्य आणि ज्ञानदेव परिपूर्ण एकरूप आहेत मात्र, ते दोघे एकाच नाण्याच्या दोन बाजूसारखे असल्यामुळें बुद्धिभेद होऊं शकतो. नाणे एकच पण छाप आणि काट्यामुळें केवढा मोठा भेद पडतो ते पहा— शकुन पाहावयाचा झाल्यास काटा आला तर मानसिक अवस्था चमत्कारिक होते आणि छाप आल्यावर मन प्रसन्न होते, उत्साह वाढतो. नाणे एकच असून हा चमत्कार, केवळ त्याला दोन भिन्न बाजू असल्यामुळें घडतो. छाप हा चिद्विलास जीवनाला अनुकूल असल्यामुळें मन प्रसन्न करणारा वाटतो तर मायावादाच्या काट्याने जग मिथ्या झाल्यावर मन खट्टू होऊन ब्रह्म ही ओसाड गांवची जहागीर असेल कां असा संदेह निर्माण होतो. सामान्य माणसाची बुद्धि जोपर्यन्त मनाची पातळी लंघून जात नाही तोपर्यन्त असाच वेडेपणा होत राहाणार. शास्त्रीय अभ्यास कोणीहि व्यवस्थित करीत नाहीत, श्रम नाहीत, कष्ट नाहीत, जबाबदारीची जाणीव नाही. याबाबत भोंगळ भुयार म्हणजे भारंभार पाठांतर करावयाचे आणि एखादा धबधबा कोसळावा तसे ज्ञानजलाच्या वर्षावांत श्रोत्यांना भिजवून टाकावयाचे; असे सगळीकडे पाणीच पाणी झाल्यावर “ पाणीच पाणी चहुकडे गं बाई गेले ज्ञानंऽऽ कुणीकडे !” अशी चमत्कारिक स्थिती होते.

ज्ञानदेव म्हणतात, अगा ऐसिया ज्ञानातें । अज्ञान म्हणणे केऊते । काये दिवो करी तयातें । अंधारूं म्हणिपे ।। आचार्यांनीहि असा सरळच तुकडा तोडला आहे. यथैव मृण्मयः कुंभो तद्वत् देहोऽपि चिन्मयः। आत्मानात्म विभागोऽयं मुधैव क्रियते बुधाः।। —अपरोक्षानुभूति.

आतां या दोन्हीं कथनांत काय फरक उरला? जगाला मायिक म्हणणे काय अथवा चिद्विलास म्हणणे काय अर्थ एकच आहे. जगाला मायिक म्हटले नाही तर चिद्विलास सिद्धच होणार नाही आणि चिद्विलास हा मायिक असतो हे तर उघड दिसते. चिद्विलास सत्य कसा असेल? हा वदतोव्याघात आहे. आणि जगाला मिथ्या नाही समजा-यचे तर काय सत्य समजायचे? जग मिथ्या आहे म्हणूनच बरे! तें सत्य असते तर कुत्र्याने हाल खाल्ले नसते. आम्ही चिद्विलास म्हणण्याने हुरळून जातो तर मायिक म्हणण्याने पार खचून जातो. याला अभ्यास म्हणतात का? केशवसुत म्हणतात, “ हर्षशोक हे ज्या सगळें त्या काय कळें त्या काय वळें?”

आतां, स्वामी स्वरूपानंद यांच्या “ अभंग चांगदेव पासष्टीं ” तील ज्ञानदेवांच्या एका ओवीचा दोन अभंगात त्यांनी केलेला अनुवाद, त्यासंबंधीं महत्वाचें निवेदन करून हें लेखन संपवितों.

स्वामींचे ते दोन अभंग मला मुळीच पसंत पडले नाहीत. यासंबंधीं त्यांच्याशी माझा मतभेद होता. अर्थात् तो Formal म्हणजे अभंगांच्या बाह्य रूपांत होता, तात्त्विक नव्हता. ज्ञानदेवांची एक Style आहे, एक शैली आहे, विषयाच्या निवेदनाची एक रीत आहे, तसेच भाषेची धाटणी, एक पद्धती आहे. ‘चांगदेव पासष्टींतील’ ही अगदी किल्ली-चीच ओवी आहे. त्याचा अभंगानुवाद करतांना स्वामींनी तो आचार्यांच्या निवेदन पद्धतीनुसार केला आहे. ही गोष्ट मला

खटकली. अनुवादांत हे असे होता कामा नये. हा प्रमाद मानला पाहिजे. तुम्ही ज्या व्यक्तीच्या वाङ्मयाचा अनुवाद करता तो त्याच्याच शैलीत व्हावयास हवा. तो दुसऱ्याच्या शैलीत करणे हे त्याशी प्रतारणा केल्यासारखे होते. एका मिनिटांत स्वामींच्या पुढे हा विषय मी मांडला; त्यांतील माझ्या म्हणण्याचा झोक हा अशा प्रकारचा होता. स्वामींनी ही गोष्ट मोकळ्या मनानें स्वीकारली. तुमच्या म्हणण्यांत तथ्य आहे अशी स्वामींनी जणूं पावतीच दिली. त्यांच्या निर्मल मनाचा मुक्त आविष्कार पाहून मला हसूं आलें. स्वामीहि हसलें. त्यानंतर दोन वर्षांनी पुन्हा जाणे झालें. त्या वेळीं स्वामींनी बरोबर ओळखले. तुम्ही तळेगांवचे ना? असा मला प्रश्न केला. मी आश्चर्यचकित झालो.

ज्ञानदेवांची मूळ ओवी अशी—

म्हणोनि अविद्या निमित्तें । दृश्यद्रष्टुत्व वर्ते ।
तें मी नेणे आयिते । ऐसेचि असे ।। चांगदेव पासष्टी.

स्वामींचा अभंगामध्यें केलेला अनुवाद पहा—

म्हणोनि अविद्या । वस्तुतः जी नाही ।
निमित्त ती होई । दृश्याभासा ।।

दाखवो ती दृश्य । द्रष्ट्यादि त्रिपुटी ।
असे आत्मस्थिती । जैसी तैसी ।।

हा अनुवाद लेशमात्रहि चूक नाही, पूर्ण यथार्थ आहे; मात्र हा आचार्यांच्या एखाद्या श्लोकाचा वाटतो, ज्ञानदेवांच्या ओवीचा वाटत नाही. हाच तो मतभेद.

आतां माझ्यापुरता मी अभंगातच अनुवाद करून ठेवला आहे; तो असा—

म्हणोनि चांगया । अविद्या निमित्तें ।
दृश्यद्रष्टुत्व तें । वर्ततसे ।।

परी तें मी नेणे । अनादी आयिते ।
ऐसे चि गा असे । स्वभावता ।।

ज्ञानदेवांच्या ओवीला कोणता अनुवाद शोभून दिसतो ते रसिकांनीच ठरवावे.

मी ‘जाणकार’ हा शब्द वापरला नाही, ‘रसिक’ असा शब्द वापरला कारण ज्ञानदेव कवि आहेत.

इति लेखनसीमा

{ बी. आर्. ठोंबरे. }